# जळमाती

श्रीकृष्ण पोवळे

पोवळे प्रकाशन

मशीद बिल्डिंग, ले. ज. रोड दादर, मुंबई-१

प्रकाशक :

पोवळे प्रकाशन
करितां वा. वि. भट
अभिनव प्रकाशन
अहमद सेलर बिल्डिंग
नायगांव क्रॉस रोड, मुंबई, १४



मुद्रक :

वा. वि. भट
फेमस प्रिंटर्स,
त्रिभुन रोड, मुंबई ४

किं
दोन रुपये चार आणे

आवृत्ति १ ली : १९४९

“ काय करूं मी तूं जळमाती मळिली
तूंच रेशमामधुनी लोकर वळिली
मज हातुन जें घडतें तें तें सारें
काय करूं मी तुवांच लिहिलें निटिलीं ”

# अ नु क्र म

## दौलतजाद्यावरती नाचली न ही कविता—

दौलतजाद्यावरती नाचली न ही कविता
सत्तेपुढती नाहीं नमविला हिनें माथा
रंगमहालांत न वा रतली निर्वसन कधीं
वारयोषिता नच ही भैरवी, कधीं ललिता.

तेव्हां तर ही स्वमुखें वेद बोलली आर्षा
आणि हिनें रंगविली पहिली प्राचीन उषा
रंगविले ऋतु सारे, रंगविली भू सारी
गिरिकंदर, नदिनाले, पशुपक्षी, हिमवर्षा.

मानवास नीति दिली, आणि हिनें धर्म दिले
श्रद्धा, पाखंड दिलें, संस्कृति अध्यात्म दिलें
गुणगुणली ही स्वमनीं रस पहिला एकांतीं
वीरांचें शस्त्र हिनें रक्तानें पाजळलें.

ओव्यांतुन रसरसली ही तिरस्कृता रमणी
गाइले अभंग हिनें भग्न झोपडीमधुनी
दोहे म्हटले रसाळ यमुना तीरावरुनी
स्तब्ध हिची झालेली नाहीं वाणी अजुनी.

अर्धमुकी ही सदाच आणि उपाशी केव्हां
हास्य न ढळलें मुखिंचें तर ये उन्मेष नवा.
विभवाचा हेवा ही कां करील स्थिरप्रज्ञा ?
पसरिल का कोणाच्या पुढतां ही कर अथवा ?

नादले न नूपुर हे दौलतजाद्याकरितां
ओठ न स्फुरले अथवा क्षुद्र वैभवाकरितां
युगयुगांतुनी चाले स्फुरवित जीवनहृदया
चिरतरुणी ही कविता, साक्षी ही आद्यंता !

## प्रगत जाहला मानव—

प्रगत जाहला मानव, सरली सारी पशुता
क्रौर्याचा लेश नसे संतांचा वध करितां.

थुंकलें न कोणीही तोंडावरती याच्या
उलट भोंवतीं जमले श्रवण्या अमृतवाचा.

कांट्यांचा शीर्षावर चढविला न मुकुट कुणी
उलट वंदिलें याला वधण्यापूर्वीं चरणीं.

क्रूसावरती नाहीं चिणिलें ठोकून खिळे
शुद्ध जावया याला लागली न दोन पळें.

हे अजस्र यंत्र जणूं क्षणिं एका थांबविलें
क्रौर्य न यांच्यांत कुठें द्वेष न यांच्यांत जळे

ऊर भरुन ये माझा ही दयार्द्रता बघुनी
प्रगत जाहला मानव पशुता सारी सरुनी !

## सिंधूच्या पृष्ठावरतीं

सिंधूच्या पृष्ठावरतीं
काष्ठें आपण दोन
योगायोगानें आलों
जवळीं कुठचें कोण!

ओसरतां ही लाट कुठें
जाऊं दूर वहात
भेटीची या कधीं पुढें
नच राहीलहि याद.

आलों आज परी जवळीं
आज न कसलें न्यून
लाटांवरतीं वाहूं ये
क्षणभर आलिंगून.

माझ्या हृदयामधिं नाचे
जें उच्छृंखल गीत
जें तुझिया नेत्रीं, गात्रीं
जाऊं तें घुमवीत.

पंथ आपुला एक असो
गीत आपुलें एक
मीलनापरी अपुल्या या
त्याची तानहि एक

गर्जू दे सिंधू भंवतीं
खा लाटांचा मार
साफल्याचे क्षण न असे
येती वारंवार.

एका लाटेवर होऊं
क्षणभर तरि बेहोष
—भेटूं वा न पुन्हां भेटूं
मज यांतच संतोष !

## शून्यता माझ्या मना ये—

शून्यता माझ्या मना ये ही तमिस्रेसारखी
शून्यता दाही दिशांना व्यापुनी ही राहिली.
शांतता निःशब्दता चोहींकडे—मी एकला
पाहतों छायाकृती ज्या दूर कोठें हालती.

दूरच्या छायाकृती त्या क्षुद्र, मोठ्या बाहुल्या
बोलती त्वेषामधें वा नाचती हर्षामधें.
कांपती कोणी भयानें, झिंगती कोणी मदें
शेवटीं छायेमधें छाया मिळाया लागती.

मी न त्यांच्यांतील किंवा मी न यांच्यांतीलही
चाललों आहे कुठें मी ? कोण जाणें मी कुठें ?
मी पुरा अश्रद्ध माझ्या नीज ये ना लोचनीं
हाय ! माझ्या ये न हातीं स्वप्न तें निद्रेंतलें.

‘ राज्य माझें या न लोकीं ’ बोलतों ख्रिस्तापरी
अन्य लोकाची न श्रद्धा आणि माझ्या अंतरीं !

# तुडवून आपुल्या पायांखालीं माती—

तुडवून आपुल्या पायांखालीं माती
एकेक उभविली त्या मातींतुन मूर्ती
निर्मिला तयानें मानव विविधाकार
निर्मिली तयानें पशुपक्षांची सृष्टी.

आपुल्या वृद्ध तरि कलाकुशल हातांनीं
वीरांचीं शीर्षें केलीं ताठर, मानी.
दुष्टांचीं केलीं हृदयें पाषाणांचीं
संतांचे डोळे भिजविसले अश्रूंनीं.

ध्यानस्थ निर्मिले बुद्धासम ते योगी
बेहोष निर्मिले ते विरहार्त वियोगी.
विरघळलें ज्यांचें जीवन मधुपात्रांत
रंगेल निर्मिले ते पाखंडहि भोगी.

चंद्रापरि केले स्तन त्यानें युवतींचे
अन् लोचन केले द्रवलेल्या रत्नांचे.
नववधू लज्जिता, वत्सल शांत पुरंध्री,
स्वैरिणी–प्राशिलें पय ज्यांनीं धुंदीचें.

निर्मिलें खड्ग, सिंहासन आणि किरीट
निर्मिली सर्व ती वस्तुजात धुंदींत.
वादळापरी ये हर्ष मुखावर त्याच्या
लाटांपरि नाचे त्याचा हर्ष विराट.

आपुल्याच उन्मादांत कला अपुली ती
विध्वंसुन टाकी भ्रमिष्ट तो भूवरती.
विक्राळ दुःख ये त्याच्या मुद्रेवरती
दुःखांतच फिरुनी तुडवी तो जळमाती.

ही उत्पत्ति, स्थिति, लय हें सर्व कशाला ?
हा हर्ष, खेद, उन्माद उरांत कशाला ?
हें कशास सारें ? कळे न त्या—न कुणास
रत राही तरिहि त्याचा हात हताश.

## हो तूं मस्त जरा रे–

हो तूं मस्त जरा रे

पय असलें पी, चढेल डोकें
अन् उतरेल जरा रे
प्रमदा आणिक मदिरा यांचा
मी मर्मज्ञ पुरा रे

रसज्ञ तूं घे, रस पिउनी अन्
दे फेंकुन नखरा रे
आशा आकांक्षांचा अपुल्या,
दे उधळून चुरा रे

तुजसम नाहीं अजुनी गेली
पूर्णत्वास धरा रे
क्षमा असावी, हृदयिं तितिक्षा
हा पुरुषार्थ खरा रे

द्रवलें माणिक ज्यांत लाव तूं
द्रव असलें अधरा रे
नसेल बाई तुला कदाचित्
परि मृत्यूस त्वरा रे

हो तूं मस्त जरा रे

## हें तर तुझेंच रूप विशाल-

हें तर तुझेंच रूप विशाल

वसुंधरा नच समोर दिसते
तुझेंच रूप विशाल
झुळझुळती नच ओहळ हे तर
तुझेंच हास्य खट्याळ

विरळ धुकें हें वातावरणीं
गिरिवृक्षांवरती
छे, ही मुद्रा तुझी लाजरी
मज पुढती स्नेहाळ.

वनराजीवर छाया पसरी
तेजोमय संध्या
मुक्त तुझा कच संभारच हा
बागडतो लडिवाळ.

आणि टेकड्या दिसतां मजला
हिरवळ पांघरुनी
स्तनयुगुलांची तुझ्या आठवण
हो मजला तत्काळ.

निळसर श्यामल मेघांना ये
उदास-सुंदरता
तूंच उघडिलें अंतर अपुलें
गे नच हें आभाळ.

तूंच दिससि मज कुठेंहि जातां
हें तर अद्भुत गे
पाठलाग कां करिसी माझा
फिरतां रानोमाळ ?

अथांग भरली माझ्या हृदयीं
प्रीती तुजविषयीं
तुझीच मूर्ती हृदयीं जरि हो
हृदयच तें घायाळ.

# तूं आईपरि माझिया–

तूं आईपरि माझिया न जनते घेशील मातें कुशीं ?
केले लाख गुन्हे क्षमा न तरिही केव्हां तुझी याचिली
मी केले अपराध शासन मला लाभेल–भोगीन मी
केलें जें पण भव्य, उज्ज्वल तुझ्या पायावरी वाहिलें.

मायेनें बघतेस तूं मज कधीं, मी धन्यता मानितों
केव्हां होउन क्रुद्ध पाहसि तरी खेळांत मी रंगतों.
माझे छंद तुला जरी न पटले, वा वाटले वाउगे
मोडूं खेळ नकोस पेटुन कधीं हट्टास तूं माउली.

माया दाट तुझ्या उरांत भरली ती कां न मी जाणतों !
जातां मी–अशरीर घेइन तुझ्या पोटीं नवा जन्म ना ?
दुःखें कैक तुझ्या उरांत कढती तीं का न मी जाणतों ?
गे उच्छ्वासच ना तुझे कढत मी माझ्या उरीं श्वासतों ?

गांधारीसम तूंहि अंध जनते मी नग्न तूझ्यापुढें
गे डोळे उघडून तूं मज पहा, द्यावा मला वज्रता !

# जरि तूं माझ्या हृदयांतच गे–

जरि तूं माझ्या हृदयांतच गे

कंठु कसा दिन मी तुजवांचुन
कंठु कशी ही रजनी गे--

गे तुझियाविण पळ, घटिका क्षण
गमती मजला अमित युगें--

आठवतां तव हंसरें लाघव
हुरहुरतें मम मानस गे—

तूं नच जवळीं, तर मज सगळीं
असूनीही नसल्यासम गे—

ये प्रेमाचा, वात्सल्याचा
मम हृदयांत उमाळा गे--

मला पाडिशी तूं भवपाशीं
जरि मी मुक्त, निरर्गल गे—

तूं तर चिन्मय, मूर्ति मनोमय
व्यापेसि माझें जीवन गे—

ये आतां ये धांवत ये ये
वर्षाऋतुच्या सरिसम गे—

## मना रे रिझवायास तुला–

मना रे रिझवायास तुला
संसाराचा भव्य पसारा पुढती मांडियला

सगे सोयरे, माणिक मोतीं
इमले वाडे, आणिक प्रीती
अशीं खेळणीं दिलीं तरी तूं कां रडतोस मुला ?

दिले तुला मद्याचे प्याले
केश, ओठ, युवतींचे डोळे
रंगित या खेळांनीं झाला क्षणभर हर्ष तुला

तुला माझिया धरुन पंजरीं
वणवण फिरलों सृष्टी सारी
क्षणिक चारुता बघुनी क्षणभर शोक तुझा शमला

धर्म–नीतिचे, व्यभिचाराचे
पाखंडाचे, परमेशाचे
खेळ दिले तुज–परि तूं अपुला खेळच उधळियला

धरुन सोंगट्या करिं तारांच्या
नियति पटावर उघाळि नभाच्या
नाचवी तुजला दारोदारीं—शिकवी नृत्यकला
क्षणभर तरि रे हंसावास तूं
म्हणुनी जिवलग हा तव मृत्यू
करि मरणाची आतषबाजी—बघ याच्या लीला
काय हवें तुज, दुःख कशाचें ?
काय हरवलें तुझ्या जवळचें ?
थांबव हा आक्रोश, क्षणामधिं येइल नीज तुला !

## मारून जिवें कां वरती आणिक तोरा–

मारून जिवें कां वरती आणिक तोरा ?
ही शालिन, ही सोज्वळ, अव्याज किशोरी.

तूं शालिन गे, उद्धत हें ऊर परंतू
तूं सोज्वळ गे, नेत्र तुझे फार विषारी

मी बोलवितां गोंधळुनी लाजसि कां तूं ?
लज्जाच तुझी प्राशुन हो चित्त त्रिकारी

हे विभ्रम, हें लाडिक संभाषण थोडें
गे शालिनता ही न, असे शुद्ध छचोरी

भोळी जरि तूं, गे नच हें यौवन भोळें
एकाच कटाक्षांत बसे वार जिव्हारीं

भाळेल स्मशानामधला तो स्मरवैरी
भाळूं न कसा रूपवती तूं जर गौरी ?

हो पारध माझी जरि काळीज दुभंगे
दुःखामधली या असल्या मौजच न्यारी

सांगून जगाला नच वाटेल खरें हें
ही निष्कपटी पोर कशी वक्ष विदारी

' रंगेल गडी हा ' जग निंदील मला गे
' अन् ती तर ही सोज्वळ अव्याज कुमारी ! '

## तें रडणारे रडतिल—

ते रडणारे रडतिल त्यांस रडूं दे
मी हंसणारा हंसतो या अवकाळीं.
ते मरणारे मरतिल त्यांस मरूं दे
मी श्रद्धेची करितों उघड टवाळी.

खुशाल बसुं दे दुबळे आशावादी
घेउन अपुल्या चिंध्या छातीजवळी.
ऊब जराशी यावी मजला म्हणुनी
मी आशांची दिली पेटवुन होळी.

मद्य पितों मी त्याची लाज कशाला ?
रे चेष्टेचा असे विषय, हा लोक.
व्यभिचाराचें मजला पाप कुठून ?
बघतो कोठें आशेनें परलोक ?

गहन असे ही माझी धुंद निराशा
अमर्याद अन् असे तींत सामर्थ्य
असे ज्यास रे काळिज आणिक मेंदू
त्यास निराशेमधेंच मिळतो अर्थ.

निराश कां मी पुससी आणिक वरती ?
लाज न वाटे तुला ? नीघ येथून.
शरम मला या तुझ्या क्षुद्र रक्ताची
माणुसकीची—ये नैराश्य म्हणून !

## घायाळ होऊन भूमीस येतां—

घायाळ होऊन भूमीस येतां
आलें मनीं प्राण जातां अनंता ?
हें संपलें येथलें कर्म निष्काम्
आलें मुखीं नाम अंतीं 'हरे राम्'

तुझें रक्त जेव्हां धरेला उडालें
अंत्यक्षणीं काय आवेग आले ?
पाहून हत्त्या अमानूष उद्दाम
आलें मुखीं नाम अंतीं 'हरे राम्'

अंत्यक्षणीं काय झाली निराशा ?
कीं कर्मयोग्यास नाहीं फलाशा ?
शांतींत घ्यावा अनंतांत विश्राम्
आलें मुखीं नाम अंतीं 'हरे राम्'

कळेना मुळीं कृत्य यांचेंच यांना
करावी क्षमा ईश्वरा या अजाणां
असें प्रार्थिलें सोडतां भूमि-कुग्राम्?
आलें मुखीं नाम अंतीं 'हरे राम्'

होती तितिक्षा क्षमा धर्मशांती
विश्वास–जाणार अंतीं अनंतीं
अन् रोमरोमांत होता तुझ्या राम् ?
आलें मुखीं नाम अंतीं ' हरे राम् '

## या बाळाच्या मुद्रेवरुनी–

या बाळाच्या मुद्रेवरुनी
ओघळतो स्मित-मरंद, मोहर
जाणिव नाहीं यास कशाची
तरि ओसंडे हर्ष अनावर.

आणि किशोरी फुलवी भंवतीं
लक्ष चांदण्या हंसतां अवखळ
डोळे मिटुनी ऐकत राही
हास्य तिचें मी खळखळ खळखळ.

मुग्ध, नवोढा माझी भगिनी
हर्ष मानसीं हिच्या निरागस
हास्य मोकळें आवरतांना
शालिनतेचा खुलवी नवरस.

प्रमदेच्या मुखपात्रांतुन या
फेंसाळत ये स्मित मदिरारस
आणि पुरंध्रीस्मितामधें या
तृप्त, शांत झालेले नवरस.

एक स्मिताची अद्भुत रेषा
बुद्धाच्या ध्यानस्थ मुखावर
या हास्यास्तव रडतों, कढतों,
जगतों, जळतों मी जीवनभर.

## दुःखही होतें कधीं—

दुःखही होतें कधीं अन् वेदना होती कधीं
तूं तरीही गे नको वाहूंस माझी काळजी.
मी न माझ्या जीविताची वाहिली चिंता कधीं
गे अहंकारांत माझ्या धुंद मी, उन्मत्त मी.

याचना केली कधीं का प्रीतिची मी सांग तूं ?
मी न त्यांच्यांतील गे जे घालिती लोटांगणें.
शब्द नाहीं बोललों मी, श्वास नाहीं कांपला
गे अखेरीच्या घडीपर्यंत होतों शांत मी.

पाहतां येई न तूंतें गे स्वतःची चारुता
प्राशतां येई न तूंतें अंतरींचें अमृत.
आणि माझ्या सांत्वनाची कां अशी घाई गडे ?
थोर माझी वेदना अन् थोर माझें सूख गे.

पाहिलें मी स्वप्न माझें, गूढ तूझ्या लोचनीं
भोगिलें मी प्रेम माझें, वक्ष माझें भेदुनी !

## तुझ्या चिंतनामधिं रमतां-

तुझ्या चिंतनामधिं रमतां
स्फुरतें काव्य अनंत
मत्प्रतिभेचे पंख तदा
आक्रमितात दिगंत.

अनंत आकारांत दिसे
ते अव्यक्त विराट
अनंत रंगामधिं त्याचें
दर्शन हो हृदयांत.

अनंत शब्दांमधुनीं ये
तें निःशब्द गुपीत
कोलाहल भेदून पडे
अंतर्नाद श्रुतींत.

अनंत ह्या रंगांमधुनी
अनंत शब्दांतून
छाया वा पडसाद उठे
माझ्या कवितेंतून.

हातांमधुनी दुबळया या
निसटे गूढ अमोल
आणि पुन्हां मी चिंतितसे
तुझेच वदन विलोल.

अनंत दुःखामधुनी गे
कविता ये जन्मास
ओळी ओळींतून तुझ्या
सौंदर्याचा ध्यास.

तुझ्या चिंतनामधिं रमतां
स्फुरतें काव्य अनंत
अनंत दुःखाचा स्वामी
अन् आभास अनंत.

## शर हृदयीं रुतल्याविण–

शर हृदयीं रुतल्याविण
गाइल का गीत कुणीं ?
शर हृदयीं रुतल्याविण
अर्थ मिळेना कवनीं.

गीतें मी गात असें
तुजवरती दिनरजनी
शर न उरीं तव रुतला
काव्य कळावें कुठुनी ?

कविता तूं मूर्तिमंत
काव्य कळेना तुजला
प्राशावा तूं म्हणुनी
कलश रसानें भरला.

मात्र थवा रसिकांचा
कलशाशीं लोंबकळे
जीस्तव हा रस गळला
तिजला नच थेंब मिळे.

दैवा हा छळ आतां
थांबव तूं थांबव रे
कोमल जरि हृदय तिचें
कर दुभंग प्रेमशरें.

मग माझ्या शब्दांचा
समजेलच अर्थ तिला
प्राशिल बिंदू बिंदू
ती या कलशामधला.

मृग जैसा वेधितात
कस्तुरीस मिळवाया
दैवा कां त्यापरि तूं
वेधियलें मम हृदया ?

# करिसी खंत कशाला रे ?

करिसी खंत कशाला रे ?

जें येणारें जें जाणारें
त्याचें दुःख कशाला रे—

हो तूं निर्भय, घे हें प्राशुन
विष, अमृत अपुल्याच करें—

धन, प्रमदा तूं भोग हवी तर
तेंहि नसो तुज बंधन रे—

कशास इच्छा घरदाराची ?
पृथ्वी ही बंधालय रे—

काय मिळे तुज वणवण भटकुन
पी हृदयांतील अमृत रे—

करिसी खंत कशाला रे ?

## वधस्तंभ माझाच मी नेतसे–

वधस्तंभ माझाच मी नेतसे
स्कंधावरी माझिया वाहुनी
निर्भत्सती लोक हे भोंवतीं
तोंडावरी माझिया थुंकुनी.

मिळे टोप हा कंटकांचा मला
गालांवरी रक्त हें ओघळे
ठेंचाळतां, थांबतां, मी कुठें
अंगावरी घाव माझ्या मिळे.

वक्षावरी ठोकतां हे खिळे
ब्रह्मांड आतां मला आठवे
न मी मानिला ईश, अन् आजही
याची, न त्याची दया, आंसवें.

मला दुःख याचेंच अंत्यक्षणीं
रडायास माता न "मेरी" कुणी.

## बोलुनी दावूं कसें मी–

बोलुनी दावूं कसें मी प्रीत माझ्या अंतरीं ?
श्यामले जाणावयाला तूं हवें होतेंस हें.
योग ये दैवीं असा हा, दे वियोगाच्या झळा
ये उशीरा प्रत्ययाला प्रीत ही शापापरी.

तूं न रंभा, उर्वशी वा तूं न कोणी पद्मिनी
श्यामला–साधीसुधी तूं पोर भोळी प्रेमळ.
आणि लाटेसारखी तूं नाचरी, उच्छृंखळ
साहुनी चांचल्य सारें, सेवितें काव्यात्मता.

सोडुनी नीती अनीती, सोडुनी संसार हा
मी कसें सांगूं तुला कीं येच माझ्या मागुनी ?
मार्ग माझ्या जीविताचा लोपला शून्यामधें
नाचऱ्या या निर्झराला मी रगीं नेऊं कसें ?

सोडुनी वाऱ्यावरी वा येच सारें जीवन
वादळी वाऱ्यापरी–जो घे नभाचें चुंबन.

## ईश्वराला न मी मानणारा–

ईश्वराला न मी मानणारा
ईशपूजा कशी मी करावी?
भक्ति माझ्या परी अंतरांत
शुद्ध गंगेपरी ही अनंत.

भेट झाली तुझी भाग्य माझें
राहिलों आणि पाखंड मीही
भक्ति मी अर्पिली अंतरींची
ईश आतां कशाला हवा गे?

देवघेवीविना प्रीतिच्या गे
जीवनीं चारुता काय आहे?
देवघेवीमधें या परंतू
आजपर्यंत झालों अपेशी.

आज कांहीं अपेक्षा नसे गे
नाहिं आशा निराशा उरांत
भक्ति माझ्या उरीं दाटलेली
वाहतों मी तुझ्या सारख्यांस.

दोन अश्रू तुझ्या लोचनींचे
फक्त मी मागतों अंतकालीं
वायु होऊन ते मी पिईन
नाहीं हव्यास आतां कशाचा.

## कितीक ऋतु संपले–

कितीक ऋतु संपले, कितिक लोटले वत्सर
स्मरूनहि तुला कसें धगधगे न हें अंतर?
सखे किती दुरावलों? कितिक ही मधें योजनें?
न हो सफळ प्रीत ही कधिंच मानवी योजनें.

तुझ्यावर तदां रसाळ कवनें किती गाइली
तरंगत मनामधें तुझिच गोड स्वप्नावली
गमे सफळ आयु हें रुचिर रंग ये जीवना
वयांत असल्या रुचे नच दुजें–प्रियाराधना.

तुवां अदय होऊनी हृदय भेदिल्या नंतर
तुझा विरह साहतां जळुन भस्म हो अंतर
मनास दुबळ्या न सत्य रुचतें, न ये पाहतां
वृथा म्हणुनी प्रीतिच्या भंवति निर्मिती दिव्यता.

तुझ्यावर लिहावयास सजतां, तुला चिंतितां
अचानक सुटे मला जटिल ही समस्या अतां
तुझे न स्मरती मला नयन, केशही सुंदर
कितीक ऋतु संपले कितिक लोटले वत्सर.

अकाल म्हणतात प्रीत मग लुप्त कां हो अशी ?
स्मरे न मज आठवूनहि तुझ्या मुखाचा शशी.
कशास मग बाळगूं हृदयिं दुःख हे मी अतां ?
समर्थ सखि काल हा तुडवितो तो पदीं शाश्वता.

## चालतांना डौल ज्याचा मत्त योषेसारखा–

चालतांना डौल ज्याचा मत्त योषेसारखा
वृक्ष शुंडेनें जयानें उन्मळावे लीलया
अन् मृगेन्द्राशींच घेई झुंज जो वीरापरी
त्या गजेंद्राला अहो या कीटकांनी ग्रासिलें.

पिंजिलें मर्मास माझ्या कीटकांनीं क्षुद्र या
कर्णरंध्रांतून माझ्या मस्तकाला भेटले.
पोखरोनी काढिला हो पर्वताचा हा कडा
श्रेय नाहीं; यातना देहास या शरपंजरीं.

येथ नक्रानें नसे जळिं पाय माझा ओढिला
बोलवाया विष्णुला श्रद्धाहि नाहीं अंतरीं.
झुंज नक्राशींहि घेतों प्राण देहीं जोंवरी
शौर्य–सामर्थ्यास यावा मृत्यु का श्वानापरी ?

येई मृत्यो ! ये समोरी, येइ वीरासारखा
फोड या गंडस्थला, मुक्ताफलांचा घांस खा.

## बहुत दिसांनीं दिसलिस तूं–

बहुत दिसांनीं दिसलिस तूं
बहुत दिसांनीं हंसलिस तूं
तरि माझ्या हृदयामाजीं
फुले कसा न वसंत ऋतू ?

रूप तुझे गे मोहमयी
पूर्वींचें अजुनीं देहीं
तरि माझें अंतर कां गे
तुझ्याकडे ओढ न घेई ?

लाजेची फुलते लाली
अजुनीही तुझिया गालीं
पिउनी ती दुरूनी अजुनी
धुंदि न कां मजला आली ?

अजुनी लाघव, लाडिकता
दिसे मला हंसतां, वदतां
विपार हा माझ्या हृदयीं
कसा भिने न मुळीं आतां ?

मज पूर्वीचें दुःख नसे
म्हणुनी हृदयीं सलत असे
झालों दुःखी दुःखानें
दुःखादिण का दुःख असे ?

ये लेवुन शृंगार नवा
ये घेऊन विचार नवा
शांत मनामाजीं माझ्या
कसला तरि अंगार हवा.

## संथ होउनी विद्युत–

संथ होउनी विद्युत
जेथल्या तिथें नाचत
नाचत करि रुमझुमाट
 झळकवीत काया.

उठवी चरणांमधुनी
वलयें वलयांमधुनी
होतां लयबद्ध ध्वनी
 लागती डुलाया.

डुलते केव्हां स्वतःच
येतां रंगांत नाच
लागुन हृदयांस आंच
 लागती जळाया.

सरळ शरसमान कधीं
नाचे झरझर जलदी
ओसंडुन स्वरजलधी
 लागतो वहाया.

केव्हां भुवई उडवी
हृदयांमधिं कळ उठवी
कमर लचकवी, झुकवी
झुलवि रसज्ञां या.

कोटिस्वरवलयांतुन
ज्वाला करिती नर्तन
जळतच हा येइ मदन
जणुं आलिंगाया.

मधु पिउनी ही नागिण
तालावर करि नर्तन
मुरडी गर्वांत मान
रसिकां डंखाया.

सळसळवित गीतस्वन
गिरकी घेतां झर्कन
तरतरुनी उठती स्तन
शुद्धच हरवाया.

अजुन धुगधुगी कोणा ?
नागांच्या दोन फणा
वक्षीं लपल्या मरणा
त्यास भेटवाया.

ये अशीच ये छुमछुम
ज्वालेवरि निःसंयम
ओठीं तुझिया जरि यम
ये मज चुंबाया.

## ईश्वरा क्षमा कर त्यांना, जर असलास–

ईश्वरा क्षमा कर त्यांना-जर असलास
तुडविती पायतळिं हे दुबळया अबलांस
निजगृहीं फोडिती वाघापरि डरकाळी
श्रेष्ठांच्या पुढती हे श्वानासम दास.

बनविती मुलांना भेकड दुबळे, स्वार्थी
बनविती आंधळे-सत्य न पाहूं देती
फिरविती रिंगणामधें स्वतःसम त्यांना
हे अवघ्या मानवधर्माचे अपराधी.

आकांक्षा यांच्या क्षुद्र, क्षुद्र अभिलाप
दारिद्र्य गिळितसे यांचा जीवनशेप
या दारिद्र्याहुन मनेंच, क्षुद्र विपारी
हें जीवन यांचें म्हणजे एक विनाश.

नेणती स्वतःला-यांना नकळे कांहीं
ईश्वरा क्षमा कर जर असलास कुठेंही !

एकेचाळीस

# तूं अन्याची गृहिणी गे–

तूं अन्याची गृहिणी गे
मी कंगाल रगेल
म्हणूं कसें मी तुला प्रिया
तुलाहि तें न रुचेल.

परि गेलेले क्षण पोरी
काय न तुज स्मरतील ?
क्षणभरही नच का क्षण ते
अंतर हालवतील ?

सज्ज यदा कांतासाठीं
करशिल तूं भ्रूचाप
तुझ्या शरांचे का तुजला
नच स्मरतील प्रताप ?

निजकांताच्या करपाशीं
बद्ध यदा असशील
काय न माझे बाहु तुला
क्षणभरही स्मरतील ?

ओठांनीं तूं ओठांना
गूज यदा कथशील
अमरापरि माझीं गूजें
नच गुंजत उठतील ?

तुझ्या सुखाचा प्याला गे
भरुं दे कांठोकांठ
परि एका तरि बिंदूची
उणीव राहिल त्यांत.

तूं उठली असतिस तदा
ज्वालेपरि अनिवार
सेवियला असता तर मी
धगधगता अंगार.

पथ एकाकी हा आतां
माझी मजला साथ
ज्वाला माझ्या हृदयींची
जळते नाचत, गात.

## हे पृथ्वीचे प्रियकर—

हे पृथ्वीचे प्रियकर सहा चक्रनेमिक्रमानें
येथें येती ऋतु रतिरता, पाहतो कौतुकानें
केव्हां भासे वसुमति मला गोरटी केव्हां किशोरी
केव्हां भासे नववधु मला कामिनी वा पुरंध्री.

मेघश्यामा कधिं मज दिसे पीत केव्हां हिमांगी
केव्हां वाटे कमलवसना, नील, वा शाद्वलांगी
केव्हां लेई तरल वसनें मलमली ही धुक्याचीं
घाली अंगी तलम वसनें रेशमी, भर्जरीची.

आला आतां शिशिर वसुधा लाजते, कांपते ही
प्रातःकाळीं दहिंवर पडे लाजली गौरदेही
रात्रीचें हें निळसर दिसे स्वच्छ आकाश सारें
अंगाला या विळखति कसे चावरे गार वारे.

रात्री केली करुन दमल्या कामिनी दोष देती
प्रातःकाळीं उठवत नसे यामिनी दीर्घ होती
शेकोटीच्या जवळ बसुनी ऊब घेती मजेनें
उत्साहानें उठति अथवा ऊब येतां उन्हानें.

गेली आतां झडुन अवघी ती जुनी पर्णराजी
पानें येती तरुवर नवी पोपटी सान ताजीं
उत्साहानें भरुन अवघा जातसे आसमन्त
येई पृथ्वी ऋतुमति अतां, पुष्पधन्वा वसन्त.

ही पुष्पांनी लगडुन कशी जातसे रत्नगर्भा
मोहायाला नटुन थटुनी येतसे काय रंभा ?
अंगी हीच्या मदरस भरे पुष्ट ही यौवनाने
नाहीं कैशी अजुन हिजला भोगिली माधवाने ?

येई आतां किसलय, वनीं कोकिळा ये वसन्त
वेली वृक्षावरुन कुसुमें गाळिती हा मरंद
ही कामानें प्रमद प्रमदा होतसे धुंदफुंद
अंगीं हीच्या रसरस करी यौवनाचा सुगंध.

गेला रात्रीं विसकटुन तो स्कंधि ये केशपाश
नारी आतां गजगति कशा चालती सावकाश
गेल्या साऱ्या पिडुन पुरत्या चुंबनालिंगनांनीं
गेले आतां सुघन स्तनही रंगुनीया व्रणांनीं.

या पृथ्वीला कळत नच कीं भोग नाहीं सदैव
आणी तुझ्यापुढति बघ हें वाढुनी काय दैव !
आतां याच्यापुढति विरहें काम जाळील तूंतें
नाहीं आतां मुळिंच उरला वेळ ग्रीष्मऋतूंतें.

संपेना हा दिवस अगदीं उन्ह तापे झळाळा
झाली आतां धरणि विरही, संपल्या पुष्पमाळा
सोडी प्रीती स्मरुन विरहें तापुनी ऊष्ण श्वास
कोमेजोनी तरुवर, लता जाहलेल्या उदास.

ये माध्यान्हीं रवि, मग बसे शांत जागीं गुराखी
पाव्याने तो मधुर अपुल्या भारुनी भूमि टाकी
संध्याकाळीं रुणझुण गुरें संथ येती गृहाला
ये वायूची झुळुक चुकुनी शांतवाया धरेला.

हे तापानें गिरिहि करडे बैसलेले निवांत
ओढे गेले सुकुन अगदीं जीवनावीण क्लांत
लेई पृथ्वी विरहवसनें पांढऱ्या या ढगांची
तापानें ही जळत बघते वाट वर्षागमाची.

होतां स्नाता मृग वरसतां गंध मातींतुनी ये
होती प्रीती धरणिहृदयीं आज हे प्रत्यया ये
लाडानें ही तरिहि रुसुनी मानिनी क्रुद्ध होई
रागानें का भुंवइ उडवी इंद्रचापापरी ही ?

दृक्षेपांची कडकड करी वीज लोटी ढगांना
आज्ञापी ही 'उलथुन अतां सिन्धु द्या' मारुतांना
वर्षे धारा गिरिवर गमे लक्षकोटी करांनीं
घेई वर्षा रगडुन स्तना पृथ्वीच्या हा हंसोनी.

ये ओढ्यांना खळखळ अतां गर्जती ते पुरानें
या भूमीची जिरून रग ये नम्रता मार्दवानें
ये वृक्षांना टवटवि नवी सांगती गूज कांहीं
ये थंडीची शिरशिरि जरा कुंद वाटे हवाही.

कोणी प्रेमी युगुल रमुं द्या गेहिं कामाभिरामा
वा ओलेती रमणि अपुल्या जाउं दे प्रेमधामा
किंवा कोणी रमत बसुं द्या संगती वारुणीच्या
राबे क्षेत्रीं कृषिक, रुजवी बीज पोटीं धरेच्या.

आला आतां शरद अपुल्या घेउनी चांदराती
ये पृथ्वीच्या वदनिं हंसऱ्या मुग्धमाधुर्य, शांती
वाटे मातें मिरवि हिरवी घालुनी कंचुकी ही
लावण्याचा बहर उसळे रत्नकांतींत देहीं.

चंद्राचा का कलश कलुनी पृथ्वि न्हाते दुधानें ?
सिन्धूच्या या सिकतिं बसतां भारतों गूढतेनें
येती वीची चमकत कशा नाचती मर्मरोनी
येई वायू कथित अपुल्या हृद्गता सळसळोनी

आणी संगें अगणित धना हेम हेमंत आला
झालीं शेतें पिकुन पिवळीं, मोल आलें श्रमाला
साफल्याच्या हृदयिं भरला हर्ष-मुद्रेवरी ये
शांति, स्नेहें अवनिवदनीं तेज हें आगळें ये.

खेळायाला अवसर मिळे, नाहिं घाई कशाची
थंडीची ही लहर सुखवी, गाढ निद्रा सुखाची
आहे गोडी सखिसह रतीं, संगती वा सुरेची
आतां चाखूं हळुहळुं रुची शांतिची, जीवनाची.

प्रात:काळीं उठुन अगदीं पाहिली जों उषा मी
आलें तेव्हां दिसुन मजला दिव्य सौंदर्य व्योमीं
आहे साक्षी अजुन निटिलीं काय प्रीतीरतीचा
गेला रात्रीं विखरुन धरे लालिमा कुंकुमाचा.

सांडे खालीं पिवळसर हें ऊन्ह आतां दिनांतीं
मेघांना ये अनुपम नवी रेशमी रंगकांती
टाकी स्कंधीं पदर वसुधा आपुला सप्तरंगी
शांती चित्तीं, गगन वर, मी शाद्वलीं वीतरागी.

## माझी नजर विषारी

कशास नाचसि नजरेपुढती माझी नजर विषारी
जाळिल अंतर फाडिल काळिज ही तलवार दुधारी.

जिंकायाला या हृदयाला प्रमदे व्यर्थ हुषारी
मी हृदयाचे कणकण उधळुन दिले दिशांना चारी.

खेळ खेळलों मी नजरेचे असले मत्त विकारी
ये काष्ठांतुन ज्वाळा आतां जिवंत धगधगणारी.

कशास विभ्रम करिसी ? त्यांची जादु न मोहविणारी
या मंत्राचा शाप भोगुनी आतां होय स्मशारी.

दिली सोलुनी त्वचा स्वतःची मी प्रीतिस्तव पोरी
तुझ्या कांतिला भाळुन आतां होउं कसा व्यभिचारी ?

## आज संपला सर्ग महाकाव्याचा–

आज संपला सर्ग महाकाव्याचा
आज हिमालय विरघळला गंगेंत
ज्या हृदयांतुन शब्द शांतिचा उठला
त्या हृदयाचा केला भेदुन अंत.

रक्त उडालें जेव्हां अंगावरती
वसुंधरे ! तूं थरारलीस कशी ना ?
तोल जाउनी कक्षेमधुनी ढळुनी ?
कां जळलीस न खालीं कोसळतांना ?

ख्रिस्तांताचा ऐकिलास आक्रोश
तूं बुद्धाचें पाहिलेंस निर्वाण
त्यानंतर हें आज नवें बलिदान
वसुंधरे ! तूं तरिही अज्ञ अजाण.

आजीवन जे अशांत शांतीसाठीं
हृद्रक्ताची त्यांच्या तुजला भूक
तूं वश होसी अमानवांना, ज्यांनीं
तुझ्या उडविले पाठीवर चाबूक.

शांति प्रेमावांचुन या थेरांच्या
या मातीला कवडीचेंहि न मोल
शांतीचा स्वर होतां आज विलीन
शवापरी मज वाटे हा भूगोल.

शब्द पुन्हां हा व्योमामधुन उठेल
या रक्ताची धार पुन्हां उसळेल
परि निज शोणित त्यजिशिल प्राशायाचें ?
वसुधे ! का तव उरांत दूध फुटेल ?

# निबिड होतां त्या वनीं अंधकार–

निबिड होतां त्या वनीं अंधकार
वीर सारे एकेक जमा झाले
धुंद हत्तीची करायास निंदा
पुढें आले लांडगे, ससे, कोल्हे.

म्हणति याच्या शरिरास काय डौल ?
सोंड याची ही किती रुंद, लांब
दांत आलेले पुढें फक्त दोन
केव्हढाले ते पाय—जसे खांब.

देह याचा जरि एवढा प्रचंड
पुच्छ, डोळे अगदींच परि लहान
सदा चाले धुंदींत मद्यपी हा
मधू गळतो गंडस्थलामधून.

सदां रंगे निज सख्यांसह जळांत
लाज लज्जा याला नसे जगाची
काय जाणे शृंगार फक्त हाच ?
जडे याला विकृती हो मदाची.

सत्य आहे यांतला शब्द शब्द
नसे जोंवर तो कुठें जवळपास
भूमि हादरतां सहज गजगतीनें
उरीं तुमच्या उरतील काय श्वास ?

## माथ्यावरी विसांवत छाया निळी नभाची—

माथ्यावरी विसांवत छाया निळी नभाची
लोळावया बिछायत येथें तृणांकुराची
मी लक्ष देइना तरि सांगे गुपीत वायू
रंगे दिशा मुलायम रंगांत पश्चिमेची.

मी गातसे मनाशिंच माझ्या अबोल गाणें
अर्थाविना तरंगत—माझी गिरा खगाची
कैशी जुळे मनोमय अज्ञात भावना ही
शांती उठे उसासत चित्तीं सुगंधवीची.

लाभे न अंगनेसह जो भोगही रतीनें
तो भोग लाभतो मज गोडी न मन्मथाची
धुंदी मला मिळे नच प्राशून वारुणी जी
शांतींत ती मिळे रुचि लाभे मजा रसांची.

माथ्यावरी विसावत छाया निळी नभाची
शांती स्रवे मनांतुन गंगाच अमृताची.

## बोलत होतिस तूं–

बोलत होतिस तूं–मी होतों ऐकत सर्व मजेंत
तों गाण्याचे सूर पांगले निमिषार्धांत हवेंत
धुंद मनानें ऐकूं लागलों मी तव गान मधूर
नकळत गेले बिलगुन केव्हां उरास अपुले ऊर.

आलिंगन मी देतां गमलें जग माझ्या हातांत
आणि वाटलें काळ थांबला हो अविनाशी रात
अन् ओठांना ओठ मिळाले जेव्हां आवेगांत
गूजें तुझिया हृदयामधलीं कळलीं एक क्षणांत.

गंध विरावा वायूवरती, संध्यारंग निशेंत
जीवन जावें विरुनी अथवा मृत्यूच्या निद्रेंत
क्षण यापरि मज एकच गमलें, झालों मी अशरीर
क्षणांत दुसऱ्या निघुनी गेलें तें सौंदर्य अधीर.

रात्र संपली आणिक गेला तो उन्माद सरून
भोगानंतरही उरलें हें हृदयीं काय अजून ?

## अश्रद्ध कसा मी झालों—

अश्रद्ध कसा मी झालों, तूं मज पुससी
निःसंग इथें मी होतां या मधुसंगें
रे, योग्य वेळ ही तत्त्वचिंतनासाठीं
मधुवरती भाळुन सत्य चळे अनुरागें.

या मधुधुंदीच्या चढतां लहरी लहरी
मज दिसावयाला लागे अंधुक हाट
हो स्पष्ट अधिक हा, वितळत जाय धुकें हें
धुंदीची उठतां लाटेवरतीं लाट.

मुद्रेवर यांच्या क्रौर्य, शस्त्र हातांत
स्वार्थाची ज्वाला डोळ्यांतून धगागे
हातांत कुणाच्या फडफडतो आसूड
हास्यांतुन यांच्या जहर पाझरूं लागे.

बाजूला येथें या सोन्याच्या राशी
ही गुलाम बुद्धी, रूप, शौर्य, अभिमान
कुणि मिळतां हट्टी आसुड हो वरखालीं
शस्त्रानें नम्र न होइल ताठर मान ?

फरफरा ओढिती वस्त्रें हे रमणींची
केसांना धरुनी ओढिति पटतां सौदा
करकरा कवींचीं आणि काळिजें खाती
हंसतांना रडती कवि हे मरती गातां.

सोन्याचा मिळतां यांना अर्धा तुकडा
हे केंविलवाणे नाचति तत्त्वज्ञानी
घोंटाळे पायीं श्वानापरि सामर्थ्य
जिव्हेनें चाटी भूमी हा अभिमानी.

चिखलांत रुते हा येथें रथ धर्माचा
वाल्मिकी गणितसे खडे असंख्य खुनांचे
द्रौपदी सज्ज हो स्वतः वस्त्रहरणाला
अन् उच्छिष्टास्तव क्षुधित ओठ व्यासाचे.

व्यापार बघुन हा केला मीही सौदा
मधुप्यालयासाठीं विकली माझी श्रद्धा
जर माझ्या हातीं मित्रा, जग हें असतें
सुरईस्तव एका विकतों मी जगसुद्धां.

## श्वसनांतुन सुटलेला वायु गुदमरे येथं–

श्वसनांतुन सुटलेला वायु गुदमरे येथें
सूर्याचे मरणोन्मुख तळमळता कर येथें
थंड भुईखालीं या शांत निजे शवनगरी
लेवुनिया भूवसनें, भूशय्येवर येथें.

कांपविली शब्दानें ज्यानें चळचळ धरणी
तो येथें शब्दहीन ठेवुन शिर भूचरणीं
मातीमधुनी याच्या सब्जाचें रोप उठे
देई धुळीमधुनीही सब्जाला खतपाणी.

तान्हीं निजली येथें जग न पाहिलें ज्यांनीं
मदविव्हल रूपवती निजल्या येथें रमणी
भोगलालसा निजली, निजलें वैराग्य इथें
त्यांचें नैराश्य उरे, आतां वातावरणीं.

संध्येच्या गडद, थंड येती धांवत छाया
शवभूमीवर येई मृत्यू हा नाचाया
अतृप्ती अजुन जळे, घोर निराशा रडते
मेल्यावरही जिवन तळमळतें कां वाया.

जगतों मी जेथें ती या परीच शवनगरी
वासना विकार परी मिसळले न भूशरिरीं
नाचतात नग्न भुतें, सूर्य प्रकाशांत तिथें
संस्कृति नच यांपरि हे लेती भूवसन तरी.

## आज तुझ्या वक्षावर शिर माझें विश्रमलें–

आज तुझ्या वक्षावर शिर माझें विश्रमलें
आणि क्षणीं त्याच मला दुःख जुनें आठवलें
काल पाहिलें न तुला दिसशील न या पुढतीं
तुजसन्निध आठवली मजला माझी युवती.

उधळून मी अंगावर देतां कांहीं नाणीं
एकांतीं मज लाभे निर्वसना मधुराणी
कात टाकुनी नागिण सळसळते ही पिवळी
स्तन ताठरत, ताठरता घे जणूं भरघोस कळी.

नव्हतें मज माहित कीं प्रीती मिळते हाटीं
कढलों, जळलों नसतों असल्या प्रीतीसाठीं
प्रीत जाणती येथें व्यवहाराचे गणितीं
कवळूं बघतात खुळे हृदय देउनी युवती.

धन नव्हतें मजजवळीं म्हणुन लाभली न प्रिया
नाहीं तर आज तिनें भरल्या असल्या सुरया
होतें जें मम हृदयीं तें मी उधळून दिलें
निर्धन कां तो मी, जो उधळी जीवन सगळें ?

आज नको प्रीत मला आज राहिलों न खुळा
आज हवी मज केवळ मधुबाला, मधुप्याला
प्राण गुंतले माझे धुंदल्या तुझ्या अलकीं
जग तमांत निजलें, ये 'बात किसलिये कलकी ?

# मी तर मस्त मवाली

मी तर मस्त मवाली
इहपरलोकावरची माझी श्रद्धा पार उडाली
झांकुन डोळे फिरवी श्रद्धा चरकाच्या भंवताली
चालतसे मी नीति धर्म हे तुडवित पायाखाली.

ये भीतींतुन धर्म, नीति ही स्वार्थामधुन निघाली
कुणि ज्ञानाच्या अज्ञानाच्या मरती भाराखाली
संशयामधें तरंगतांना होती कुणि वरखाली
द्वंद्वामधुनी या सुटलों मी, माझी गोष्ट निराळी.

जाणियलें मी अंतीं केवळ विनाश मृत्यू भालीं
त्रिलग ओठ हे होतिल आतां रमणीच्याच कपोलीं
पिइन मद्य आकंठ जोवरीं न गाडिलें भूखालीं
मी मदमस्त मवाली

## औदात्य निघालें क्षुद्रतेस सजवाया–

औदात्य निघालें क्षुद्रतेस सजवाया
करुणाच निघाली पाषाणा द्रववाया
अश्रूंचा सिंधू निघे द्वेष विझवाया
ही निघे तितिक्षा धरेस उरीं कवळाया.

हिमगिरीपरी तो विरघळला दुःखानें
शिशिरापरी क्षणभर थरथरला शोकानें
दाबून आपुल्या उरीं अनंत उमाळे
पसरले आपुले पंख विशाल दयेनें.

चालली झराझर त्याची दुबळी काया
नेत्रांतुन सांडत अश्रू आणिक माया
वांकला जरासा–हृदयीं दुःख अपार
जड दया जाहली अगाध त्याच्या हृदया.

आर्तांच्या गालीं स्पर्शुन अपुले ओठ
चुंबीत तयांचे अश्रू, दुःख अलोट
अंशूपरि अपुल्या स्पर्शांनीं श्वासांनीं
चालला शांतवित दुःखें आणिक क्रोध.

चौसष्ठ

विद्धांना अपुल्या वक्षीं आलिंगून
चालला वेदना त्यांच्या हा शमवून
चालला पुढें-व्हा कांट्यांनो अंकूर
पथ मृदुल करा तनु सर्पांनो पसरून !

त्या अर्धनग्न अन् अपमानित अबलांना
वात्सल्यमूर्तिनें दिला धीर रडतांना
ती वत्सल त्याची दृष्टी प्रेमळ शांत
वस्त्रासम झाली किती नग्न वक्षांना.

पथ अनंत, दुःखें अनंत शमवायाची
हो दुभंग सरिते वाट सोड तूं याची
ख्रिस्ताच्या रक्तासम हीं बहुमोलाचीं
वे वसुंधरे तूं पिउन आंसवें याचीं !

## कित्येक लोटलं दिन—

कित्येक लोटले दिन, संपे न खेळ कां हा ?
येशी अशी अचानक माझ्यापुढें पुरंध्री !
माझी त्वचा जळे जणुं क्षोभून रोमरंध्रीं
टाळावयास लोचन मी पाहिलें नभा या.

अन्य क्षणीं परी मज मी सांवरून घ्याया
मिसळून दे स्मितामधिं ती भावना विषारी
खोटें कथूं कशास्तव ? मी चित्र तें चितारीं
होतें कसें जरी मम होतीस तूंच जाया ?

मातें मुली क्षमा कर हा दोष या त्वचेचा
काव्यापरी न जीवन व्योमांत घे भरारी
नाशाकडेच धांवत आयुष्य हें विकारी
जाणूनही सुटे नच हा लोभ जीवनाचा.

आतां उरांत प्रीत न, आतां कशास मैत्री
प्याला भरून सांडत माझ्या उरीं विषाचा
यानें तरी जळेलच हा मोह जीवनाचा
अंतीं कुशींत देइल विश्राम ही धरित्री.

## वाळूवर झोंकुन मी तनु माझी धुंद दिली–

वाळूवर झोंकुन मी तनु माझी धुंद दिली
लहर मद्य भ्रांतीची शीर्षीं माझ्या उठली
नाचत होता वायू, पिउनी धुंदी कसली
आक्रोशत सिंधू जणूं जळतच होता अनलीं.

होता तम शीतल, जणुं गर्द धुक्यापरि भंवतीं
जलदीपापरि तारे केंवि तमावर तरती ?
तम होतां विरल काय पडतिल उल्का शीर्षीं ?
अर्ध जागृतीहि विरे याच विचारासरशीं.

वायूनें गदगद मज हलवुन जागें केलें
सिंधूचे आक्रोशहि हळु कानावर आले
आणि स्मशानामधुनी वास चितेंतुन आला
जागृत वा निद्रित मी तरिही कळलें न मला.

तोंच क्षणार्धांत लहर वाळूची वर उठली
आणि सिंधुलहरींवर छाया वाहत गेली
हा खचितच येशू–कीं दृष्टी माझी भ्रमली
सिंधूच्या लहरींशीं क्षितिजीं वाळू विरली.

सदुसष्ठ

आंदोलत उठल्या त्या वाळूमधुनी लहरी
मातीचे मानव त्या लहरींतुन येत वरी
आक्रोशत, किंकाळत सिंधुजळीं ते विरती
क्षितिजाच्या गाढ तमीं शोकनाद विरवळती.

फिरुनी उठल्या लाटा शोकानें नभ भरलें
शोकाचे आर्तस्वर सिंधू घुसळत गेले
दृश्य, नाद विरुनी ते भरले वातावरणीं
शोक भरे मम हृदयीं, हळुहळु सरली रजनी.

वाळूवरुनी फिरतां शांत उषःसमयीं मी
शोकच्छाया दिसली सिंधुवरती, व्योमीं
तोच शोक मम हृदयीं-कुणि म्हणोत भ्रम सारा
सत्य आकले न मला-मी भ्रमांत भ्रमणारा.

रुबाया—

कोलाहल चाले हा भीषण अवतींभंवतीं
कुणि रडती, ओरडती, हंसती, कोणी मरती
दूर कुठें गीतांच्या लहरी उसळत उठती
ऐकूं ये मज केवळ आर्त स्वरमाला ती.

*

जीवनांत अर्थ नसे, हाच मिळे अर्थ मला
शोकाविण हर्ष नसे, हाच मिळे अर्थ मला
मेल्यावांचून मिळे शांति न हृदयास इथें
ऊर फुटे तोंवर कर शोक, मिळ अर्थ मला.

*

चंचल हें नभ सारें, चंचल हे ग्रहतारे,
चंचल भूमी इथली, चंचल इथले वारे,
चंचल या देहाचा माझ्या बिंदू बिंदू,
मन माझें युवतीपरि चंचल कोठें न ठरे.

*

धांवतसें चंचलतेसह मी समवेगानें
स्थिरता म्हणुनी मिळते मजला आभासानें
रमणी, व रुणि म्हणजे मूर्तिमंत चंचलता
प्रज्ञा हो स्थिर माझी चंचल या संगतिनें.

*

आवर हा शोक, नसे भ्याडांस्तव ही धरणी
कढणारच लाव्हारस अपुल्या अंतःकरणीं
जें होईल तें बघ तूं; शोक नको, हर्ष नको
स्तब्ध रहा; पाहुन घे काळाची ही करणी.

*

प्रज्ञा हो स्थिर ज्यांची, चंचलमति जे असती
घाव घणांचे नच रे कोणासही हे चुकती
जीवनांत कुणि रडती, मरणांतहि कुणी हंसती
सारे हे परि एका अग्नीमाजीं जळती.

*

हंसतांना हृदयीं मी शांत राहुनी बघतां
रडतांना भंवतीं मी स्तब्ध राहुनी बघतां
निद्रेंतुन जागृति ये आणि मला स्वच्छ दिसे
माझ्या दृष्टीपुढतीं जीवन हो नग्न स्वतः

*

मेलों तर मेलों मी पर्वा कसली करतां
मरण्यापूर्वीं होइल पुढला हा चषक रिता
मेलो तर मेलों मी मृत्यु न माझा वैरी
मरण्यापूर्वीं हृदयीं आलिंगिन हेमलता

*

मृत्यू म्हणजे केवळ शेवटचा मधुप्याला
मृत्यू म्हणजे अंतिम सखिसंगत हृदयाला
जाणिव जातां विरुनी हो विकीर्ण जळमाती
भिउं नकोस जीवनास, भिउं नकोस मरणाला.

*

माझ्या शोकासाठीं भोग निर्मिले कोणी
माझ्या प्रज्ञेसाठीं गूढ निर्मिलें कोणी
शांति, तितिक्षा माझी दुःख, विनाशामधुनी
माझ्या प्रेमासाठीं विश्व निर्मिलें कोणी.

* * *

निशेंत जाई निशा कशी न कळे ती
रक्तरंग ये कसला पूर्वेवरती ?
भरे वारुणी पूर्वेच्या प्याल्यांत
हाय आमुचे हात न तेथें रिघती !

*

धर्मरक्षणासाठीं नच आलास
आलास न तूं साधुपरित्राणास
प्रभो, कुठें तव असेल जर अस्तित्व
निमंत्रितों, ये निदान मधुपानास !

*

मधु ही —यौवन प्रमदांचें रसरसलें
कालकूट या यौवनांत दिरवळलें
अश्रु मिळाले बुद्धाचे याच्यांत
अन् ख्रिस्ताचें रक्तहि यांत उडालें !

*

या मद्याची वर्णूं काय बहार
पावे अंतर्धान यांत अंगार
जिंकियली जी सुधा वैनतेयानें,
सर्पचुंबिता सुधाच ती—विषधार !

*

मधुप्याला जर मिळता प्रत्येकास
हिमगौरी जर मिळती सहशय्येस
आणि मृत्युचें भय नसतें जीवांना
ईशकल्पना तर सुचती न कुणास.

*

आज ऐकिलें कुणी बाल ख्रिस्ताला
वधिलें मारुन वक्षावरती नाला
रे ख्रिस्ता, तूं किती जन्म घेणार?
हृद्रक्तानें भिजविणार किति भूला?

*

धुंद सदा, मस्तींत दंग, रंगेल
मधुसह रमतो—ती तर पोर छबेल
मज जगताची पर्वा कुठुन असावी?
पृथ्वी म्हणजे धूलीरजच विशाल.

*

निशा सर्व भूतांना तेव्हां जागूं
प्रमदे-संगें ही मधु आम्ही भोगूं
निद्राधिन, ज्यावेळीं हें जग जागे
योग्यांचीं आम्हांस लक्षणें लागू!

* * *

व्यथितान्तर फिरतां मी जनसंमर्दांमधुनी
व्यथितान्तर फिरतां मी सागरवेलेवरुनी
वायूशीं, व्योमाशीं वा सागरलहरींशीं
कुजबुजतों वा हंसतों मी माझ्या हृदयाशीं.

*

रे वायो ! मजपरी तूं चंचल, उच्छृंखल तूं
माझ्यापरि व्योमाचें घेसी ना चुंबन तूं
गंधवाह तूं तर रे भाववाह मीहि असें
तूं रसार्द्र मीहि तसा करुणेनें आर्द्र असें.

*

रे सिन्धू ! माझ्यापरि अंतरंग खोल तुझें
बिंबित हो नभ हृदयीं मम हृदयीं भाव जसे
तळमळशी, आदळशी सीमेचे बंध तुला
तळमळतों, आदळतों बांधिति हे पाश मला.

*

आभासावांचुन रे अन्य काय व्योमा तूं
चिर, अनंत जरि असशी, तरि केवळ शून्यच तूं
आभासापरि माझें जीवन हें — अंत तया
व्योमापरि शून्यच तें, शून्यच — सारी माया.

*

सत्य असो वा न असो, केवळ माझ्याकरितां
जीवन हें, वायूवर शर धांवे सळसळता
कुठुनी आला न कळे, कोठें जाणे न कळे
सळसळणें जीवन हें -केवळ हें- हेंच कळे.

*

जीवनवृक्षास नसे फल-आशा धरुं कसली
निष्फल पुष्पांनीं पण त्याची तनु मोहरली
गंधाला भाळुनियां फल बघतों भंवताली
गंध मिळे वायूला आणि फुलें भूमितळीं.

*

व्योमांतुन ढळलेली उल्का-जीवन म्हणजे
मेघांतुन सुटलेली विद्युत्-जीवन म्हणजे
झळझळणें, सळसळणें क्षणभर-जीवन म्हणजे
अन् वाऱ्यावर जाणें विरुनी- जीवन म्हणजे.

*

तूं श्रद्धा अवमानुन फोडिलीस कां मूर्ती ?
शून्यांची त्यामधुनी उठलीं वलयें वरती
क्षितिजासम वलयें ही भंवतालीं गरगरती
शून्यांच्या पाशांनीं बद्ध असे ही नियती.

*

श्रद्धा म्हणजे निद्रा स्वप्नांचा गोड थवा
शाश्वतिचा जींत मिळे खोटा संमोह जिवा
निद्रेंतुन उठलें मी, तें पुढचें स्वप्न गळे
जागृतींत काय कुणा निद्रेंतिल स्वप्न मिळे ?

*

सत्याहत्तर

श्रद्धा म्हणजे धुंदी, श्रद्धा म्हणजे मदिरा
प्राशितांच वाटतसे शाश्वत ही क्षुद्र धरा
श्रद्धा माझ्या न उरीं, म्हणुनी मी मद्य पितों
श्रद्धा माझ्या न उरीं, मदिराक्षीसह रमतों.

*

मद्याचा ओठांनीं चुंबियला मी प्याला
चांदण्यांत रमलों मी घालुन सखिकरमाला
' शांत रहा हृदया ' मी म्हटलें, ऐके नच तें
मदिरेनें हृदयाला धुंदि न माझ्या येते.

*

जीवन हें जायचेंच–घे पिउनी तूं मदिरा
जीवन हें जायचेंच–चुंबन घे तूं अधरा
जीवन हें जायचेंच–स्मृतिचीं हीं पदचिन्हें
पुसुनी जातील क्षणीं काळाच्या लाटेनें.

*

बद्ध असासि तूं तर रे काळाच्या पाशांनी
का मानववंशाची तरि देइल ग्वाहि कुणी
निष्प्राणच होती ही वसुधा कित्येक युगें
हिमयुग येईल पुन्हां तोंवरती कोण जगे ?

*

चाड धरूं मी कसली ? पर्वा जगताची कां
लोभ धरूं मी कसला ? हें लौकिक बंधन कां
शांति हवी हृदयाला, शांति नसे भूवरती
जीवन म्हणजे वादळ-जीवन म्हणजे भ्रांती.

*

म्हणुनी मी मस्त बने, म्हणुनी रंगेल असे
करितों जरि कर्म तरी त्यावर विश्वास नसे
हा अकाम कर्मयोग जीवनांत आचरिला
मज म्हणोत कुणि योगी, कुणि म्हणोत भ्रष्ट मला.

*

मद्य पितों त्यांतहि रे माझा आत्मा न रमे
मदिराक्षीसह रमतो तरि कोठें मज करमे?
कालकूट प्यालों तें मीहि शिवापरि जहरी
चंद्रापरि चंद्रमुखी, गंगेसम मद्य उरीं.

*

'वधिती नच शस्त्रेंही, अग्नीनें हा न जळे
वायु वाळवी नच या,' प्रभु तूं हें सांगितलें
मी बघतों शस्त्राविण आत्मे वधिले जाती
मी बघतों अग्नीविण आत्मे जळती, मरती

*

जीवनांत श्रेय नसे, म्हणुनी तुज स्वर्ग दिला
मद्यापरि मोहक हा भ्रम कोणी निर्मियला
मृगजळांत कस्तुरिमृग फिरती–जरि रण भंवतीं
त्यांच्या उदरांत पहा गंधकोष तुजसाठीं.

*

काळाला नच सीमा, कल्पांतीं ग्रहतारे
पुष्पफलांसम तरुच्या झडल्यानंतर सारे
फक्त उरे तम व्योमीं, फक्त एक शून्य उरे
शून्यांचा मम हृदयीं ज्यापरि–काळोख भरे.

*

कवळुन सखि हृदयाशीं चारुता न येइ करीं
देहांतुन भिन्न न हो आत्माही त्याचपरी
आत्मा म्हणजे व्याधी शरिराला जडलेली
आत्मा म्हणजे अग्नी जळत अविश्रांत उरीं.

*

श्रद्धा ज्याची न असे इहपरलोकावरतीं
शोकावांचून नसे रस दुसरा त्यासाठीं
क्षुब्ध अशांतीविण नच क्षण त्याचा एक सरे
जग जगतें निद्रेमधिं, जीवन त्याचेंच खरें.

*

तरिही मी तुज म्हणतों, घे मदिरा तूं पिउनी
तरिही मी तुज म्हणतों, यौवनधन घे लुटुनी
मृत्यूपरि गहन असे जीवन —ही रम्य कला
जीवन जगण्यावांचुन गत्यंतर नाहिं तुला.

*

बाळांची बघतां मी मुद्रा निर्मळ हंसरी
वा सखिची बघतां मी दृष्टी प्रेमळ गहिरी
गाढ विकारांचे ते पाश मला आवळती
म्हणतों मी, हृदया रे, जीवनाविना न गती.

*

लोहचुंबकापरि हें जीवन आकर्षुन घे
स्थिरप्रज्ञेलाही हें जीवन हलवूं लागे
मेनकेस भाळे हा संयम सोडून ऋषी
पांचाळी हृदयांतरिं कर्णाला अभिलाषी.

*

जीवन-ही अर्थशून्य एक समस्याच खरी
मधुप्याल्यापरि अपूर्ण हें भरलें कितिहि तरी
अर्थ तयाचा कळतो गमतें तरिही नकळे
प्यास वाढते पिउनी आणि पितां हृदय जळे.

*

म्हणुनी रे जग जीवन, भय सारें सोडुन तूं
भिवविताल नच तुजला आधि, व्याधी, मृत्यू
हांस कधीं, ढाळ कधीं अश्रू डोळयांमधुनी
ख्यालिखुशालींत रहा, जाण मात्र सत्य मनीं.

*

आकर्षण बंधनांत जोंवर हे ग्रहतारे
बद्ध असिस तोंवर गे जीवनांत तूंहि घरे
जग जीवन-जें जें ये पुढती प्राशून पहा
जाण सत्य अंतिम तूं आणि जगीं अभय रहा.

*

ख्यायाम

श्रीकृष्ण पावळ याचे आणखी

**कविता संग्रह**

प्रसिद्ध

**अग्नि पराग**

(किंमत २॥ रुपये)

●

●

आगामी

●

**युग विरही**

**महामानव**

●